**जिल्हा रुग्णालय, जळगांव येथील**
**२९३ अस्थाई पदे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक- जिरुप-१९१०/प्र.क्र. १६/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**शासन निर्णय :**

उपरोक्त शासन निर्णयानुसार जिल्हा रुग्णालय, जळगांव येथील २९३ अस्थाई पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यन्त चालू ठेवण्यात आली होती. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** २९३ पदे या शासन निर्णयान्वये दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यन्त पूढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १**

" २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११०-२ - मुफसल क्षेत्रातील रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये ( २२१० ००१४६)"

३. हा निर्णय वित्त विभागाच्या क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०२२००१०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सुहास रा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, आरोग्य सेवा,मुंबई. / सहसंचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय) मुंबई (३ प्रती)
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, जळगांव.
जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१३) (अर्थसंकल्प-१९) मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)